आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती या योजनेंतर्गत सन २०१९-२० करीता निधी वितरीत करण्याबाबत...
(लेखाशिर्ष- ३०५५ ००४३ )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी २०१९/ प्र.क्र.१३०/ का-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : - १३ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.१.०४.२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.८.०७.२०१९.
३) गृह (परिवहन) विभाग, नस्ती क्र.एसटीसी- ०२२० / प्र. क्र. ५३ / परि-१.

**शासन निर्णय-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्रातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांकरीता मागणी क्र.टी-५, ३०५५, मार्ग परिवहन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ००- मार्ग परिवहन, ७९६- जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) (०१) आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती ( ३०५५ ००४३ ), ३१- सहायक अनुदाने या बाबीखाली रु.१००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे. संदर्भाधीन क्र.२ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील कार्यक्रम खर्चाच्या योजनांकरीताच्या अर्थसंकल्पित तरतूदींच्या ६० टक्के मर्यादेतील निधी वितरणास मान्यता देण्यात आलेली आहे.

२. गृह विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरून उपरोक्त अर्थसंकल्पित तरतूदीतून वित्त विभागाच्या विहित ६० टक्के निधी वितरण मर्यादेत (०१) (०१) आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती ( ३०५५ ००४३ ), ३१- सहायक अनुदाने या बाबीखाली रु. ६०.०० लाख ( अक्षरी रुपये साठ लाख फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव ( परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. विभागप्रमुख /नियंत्रक अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व गृह (परिवहन) विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतुद आदिवासी उपयोजना क्षेत्रातच खर्च होईल याबाबत दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकांन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत असून सदर शासन निर्णयातील अटींची पुर्तता होत असल्याची गृह (परीवहन) विभागाने खात्री करावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२०६१७१०५२३२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.02.14 12:04:24 +05'30'

**(किरण कि.पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव ( परिवहन ) , गृह विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे .
४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा / गडचिरोली.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ, गडचिरोली.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई
८. कार्यासन क्र. २ व १७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.